पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड यांच्या कार्यक्षेत्रांतर्गत तळेगांव-दाभाडे पोलीस स्टेशनचे विभाजन करून नवीन शिरगांव-परंदवाडी पोलीस स्टेशन निर्माण करण्यास व त्यानुषंगाने मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यास आणि अनावर्ती खर्चास मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीओएस-०८२०/प्र.क्र.८६/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : २२ ऑक्टोंबर, २०२१.

वाचा :-

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-अ/४७/शिरगांव पोस्टे/पि.चि./१/२०२०, दि.२६.१०.२०२०.
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक ०२.०६.२०१५

**प्रस्तावना :-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य मुंबई यांनी उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील दिनांक २६.१०.२०२० रोजीचे पत्रान्वये पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड यांच्या कार्यक्षेत्रांतर्गत तळेगांव-दाभाडे पोलीस स्टेशनचे विभाजन करून नवीन शिरगांव-परंदवाडी पोलीस स्टेशन निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव मान्यतेसाठी सादर केला आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड यांच्या कार्यक्षेत्रांतर्गत तळेगांव-दाभाडे पोलीस स्टेशनचे विभाजन करून नवीन शिरगांव-परंदवाडी पोलीस स्टेशन निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तावित शिरगांव-परंदवाडी पोलीस स्टेशनसाठी पोलीस निरीक्षक-०१, सहायक पोलीस निरीक्षक-०२, पोलीस उपनिरीक्षक-०४, सहायक पोलीस उपनिरीक्षक-०३, पोलीस हवालदार-०९, पोलीस नाईक-१८, पोलीस शिपाई-३६,सफाईकामगार-०२ असे एकूण ७५ पोलीस अधिकारी / कर्मचाऱ्यांची आवश्यकता आहे.

प्रस्तावित शिरगांव-परंदवाडी पोलीस स्टेशनकरिता पोलीस आयुक्त ,पिंपरी चिंचवड यांचे आस्थापनेवरील मंजूर संख्याबळातून पोलीस निरीक्षक-०१, पोलीस उप निरीक्षक-०२, सहायक पोलीस उप निरीक्षक-०१, पोलीस हवालदार-०९, पोलीस नाईक-०९, पोलीस शिपाई-०७ अशी एकूण २९ पदे उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

तसेच सदर पोलीस स्टेशनसाठी आणखी आवश्यक असणारी सहायक पोलीस निरीक्षक-०२, पोलीस उप निरीक्षक-०२, सहायक पोलीस उप निरीक्षक-०२, पोलीस नाईक-०९, पोलीस शिपाई-२९ ,सफाईकामगार-०२ अशी एकूण उर्वरित ४६ पदे पिंपरी चिंचवड पोलीस आयुक्तालयासाठी तीन टप्यामध्ये मंजूर करण्यात आलेल्या मनुष्यबळातून पुरविण्यास मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचा तपशील सदर शासन निर्णयासोबतच्या "**परिशिष्ट-अ"** मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहील.

३. नवनिर्मित शिरगांव-परंदवाडी पोलीस स्टेशनकरिता सदर शासन निर्णयासोबतच्या "**परिशिष्ट-ब"** मध्ये नमूद केल्याप्रमाणे रु.२५,५१,४००/-( अक्षरी रुपये पंचवीस लाख एकावन्न हजार चारशे फक्त) इतक्या अनावर्ती खर्चास मान्यता देण्यात येत आहे

४. नवनिर्मित शिरगांव-परंदवाडी पोलीस स्टेशनकरिता येणारा अनावर्ती खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हद्दनिश्चितीबाबतचा प्रस्ताव पोलीस महासंचालकांनी शासनास तात्काळ सादर करावा.

६. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३८७/आपुक, दिनांक ३०.०८.२०२१ अन्वये वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार व वित्त विभाग क्रमांक.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५ अन्वये शासनास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२२१६१४३७०२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rupali Sanjog Kabare

Digitally signed by Rupali Sanjog Kabare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, serialNumber=5cb43a03d973ff96aabbf02a74864a4681399fe663d8fbde0441a596beb3acdd, cn=Rupali Sanjog Kabare
Date: 2021.10.22 16:16:58 +05'30'

**( रूपाली कबरे )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. मा.मंत्री,गृह यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री,गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
३. मा.राज्यमंत्री,गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. पोलीस आयुक्त,पिंपरी चिंचवड
९. विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परिक्षेत्र, कोल्हापूर.
१०. जिल्हाधिकारी, पुणे.
११. पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१४.सह सचिव(पोल ३),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
१५. सह सचिव(पोल-७),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
१६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वांद्रे,मुंबई.
१८.वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१/आ.पु.क.
१९. निवड नस्ती, पोल-३.

शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक : पीओएस-०८२०/प्र.क्र.८६/पोल-३,
दिनांक:२२ ऑक्टोंबर, २०२१ चे सहपत्र.

**"परिशिष्ट-अ"**

**"परिशिष्ट-अ"**

**नवनिर्मित शिरगांव-परंदवाडी पोलीस स्टेशनकरिता पोलीस आयुक्त, पिंपरी-चिंचवड यांच्या आस्थापनेवरून सद्यस्थितीत उपलब्ध करून देण्यात येणा-या पदांचा तपशिल**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. | पोलीस निरीक्षक | S-१८-(रू.४९१०० ते रू.१५५८००) | ०१ |
| २. | पोलीस उप निरीक्षक | S-१४-(रू.३८६०० ते रू.१२२८००) | ०२ |
| ३. | सहायक पोलीस उपनिरीक्षक | S-१०-(रू.२९२०० ते रू.९२३००) | ०१ |
| ४. | पोलीस हवालदार | S-९-(रू.२६४०० ते रू.८३६००) Spl-७५० | ०९ |
| ५. | पोलीस नाईक | S-८-(रू.२५५०० ते रू.८११००) | ०९ |
| ६. | पोलीस शिपाई | S-७-(रू.२१७०० ते रू.६९१००) Spl-७५० | ०७ |
| | | **एकुण पदे -** | २९ |

**व**

**नवनिर्मित शिरगांव-परंदवाडी पोलीस स्टेशनकरिता पोलीस आयुक्त, पिंपरी-चिंचवड यांच्या आस्थापनेवर तीन टप्प्यात निर्माण करण्यात येणा-या पदांमधून उपलब्ध करून देण्यात येणा-या पदांचा तपशिल**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. | सहायक पोलीस निरीक्षक | S-१५-(रू.४१८०० ते रू.१३२३००) | ०२ |
| २. | पोलीस उप निरीक्षक | S-१४-(रू.३८६०० ते रू.१२२८००) | ०२ |
| ३. | सहायक पोलीस उप निरीक्षक | S-१०-(रू.२९२०० ते रू.९२३००) | ०२ |
| ४. | पोलीस नाईक | S-८-(रू.२५५०० ते रू.८११००) | ०९ |
| ५. | पोलीस शिपाई | S-७-(रू.२१७०० ते रू.६९१००) Spl-७५० | २९ |
| ६. | सफाईकामगार | S-१-(रू.१५००० ते रू.४७६००) | ०२ |
| | | **एकुण पदे -** | ४६ |

शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक : पीओएस-०८२०/प्र.क्र.८६/पोल-३,
दिनांक: २२ ऑक्टोंबर, २०२१ चे सहपत्र.

**"परिशिष्ट-ब"**

**नवनिर्मित शिरगांव-परंदवाडी पोलीस स्टेशनकरिता येणारा अनावर्ती खर्चाचा तपशील**

| अ.क्र. | तपशील | संख्या | रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १. | जीप | ०२ | ११,००,०००/- |
| २. | पाच टनी वाहन | ०१ | ७,०५,०००/- |
| ३. | मोटार सायकल | १० | ५,००,०००/- |
| ४. | टेबल | २५ | ७५,०००/- |
| ५. | खुर्ची | ७५ | ७५,०००/- |
| ६. | स्टील कपाट | १५ | ६०,०००/- |
| ७. | लाकडी बेंच | १० | ५,०००/- |
| ८. | लाकडी स्टुल | १० | २,०००/- |
| ९ | वॉकीटॉकी सेट | ०३ | ५४,०००/- |
| १०. | संगणक | ०७ | २,४५,०००/- |
| ११. | प्रिंटर | ०७ | ४९,०००/- |
| १२. | संगणक टेबल | ०७ | १०,५००/- |
| १३. | संगणक खुर्ची | ०७ | ४,९००/- |
| १४. | दूरध्वनी संच | ०४ | ६,५००/- |
| **एकुण रक्कम** | | | **२५,५१,४००/-** |

***************